# ताम्रपट्ट-ताम्रपत्र

# ता म्रा नु शा स न म्

प्राचीन—इतिहास संशोधनाचीं जीं साधनें आहेत त्यात ताम्रपट हें एक प्रमुख साधन आहे. फार प्राचीन कालापासून आपल्या या परम पवित्र आर्यावर्तांत राजे, महाराजे, सम्राट्, राजपुत्र, राजप्रतिनिधि इत्यादि चिरकल्याणप्राप्त्यर्थ सच्छील विद्वान् ब्राह्मणाना ग्रा, भू हिरण्य इत्यादि दान ग्रहण, सङ्क्रान्ति इत्यादि पर्वसमयीं देत असत. त्यांतील भूदान हें भावि स्ववशज किंवा तात्कालिक सत्ताधीश यानीं चिरकाळ चालवावें याकरिता शुद्ध अशा ताम्रधातूच्या पत्रावर उत्कीर्ण करून ठेवीत असत. क्वचित् शिलावरहि उत्कीर्ण करण्यात येत. दानाव्यतिरिक्त इतर विषयातहि शिलालेख किंवा इष्टकालेख उत्कीर्ण केलले उपलब्ध झालेले आहेत. खाल्डिया, मिश्र, तातार इत्यादि देशांतील इष्टकालेखानीं तर इतिहासात अभिनव भर घातली आहे. तातार देशांतील संस्कृत नावनीतक हा वैद्यकग्रंथ असाच उपलब्ध झाला. तंजावर येथील श्रीबृहदीश्वर देवालयाच्या वास्तूत दिडशे वर्षापूर्वीच शिलोत्कीर्ण मराठ्याच्या विस्तृत इतिहासानें तर या काळीं विक्रम केला आहे. इष्ट विषय विटावर आयसादि लेखनीनें लिहून

न्या विटा भाजावयाच्या म्हणजे त्या पक्क्या होतात. शिळा या क्वचित वातातपजलाघातानीं क्षरण पावतात, पण कमावलेल्या मातीच्या पक्क्या विटा अधिक सुरक्षित राहूं शकतात. या इष्टका ( विटा ) अनादि कालापासून प्रचारांत आहेत. यज्ञामध्यें चयनाकरितां या इष्टकांचा उपयोग केला जातो आणि हीं चयनेंहि अनेक आकाराचीं असतात. आणि त्याकरितां करावयाच्या गणितांचीं शुल्बसूत्रेंहि प्रसिद्ध आहेत. अस्तु. ताम्रपट्ट अथवा ताम्रपत्र याचें वर्णन विधान इत्यादिक याज्ञवल्क्यस्मृति, स्कंदपुराण इत्यादि प्राचीन ग्रंथांमध्यें आलें आहे. बृहस्पतिस्मृतीमध्यें भूम्यादिदानाचें प्रयोजन फल, इत्यादि सविस्तर वर्णिलें आहे. किंबहुना बृहस्पति स्मृतींत याच विषयाचें बाहुल्यानें प्रतिपादन आलेलें आहे.

मुंबईच्या निर्णयसागरमुद्रणालयानें प्रसिद्ध केलेल्या संस्कृत "काव्यमाला" नामक मासिकांत 'प्राचीन लेखमाला" तीन भागांत प्रसिद्ध झाली आहे. यांत १७३ लेख आले आहेत. त्यांत कांहीं ताम्रपट्ट आहेत आणि कांहीं शिलाशासनेंहि आहेत. धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेचें "प्रभात्" या नांवाचें मासिक ४० वर्षांपूर्वी प्रसिद्ध होत असे. त्यांत असे २६ लेख आले असून त्यांत ६ संस्कृत आणि २ प्राकृत आहेत.

आर्यावर्तांत, पाश्चात्य देशात, पातालखंडांत प्राचीन इतिहास संशोधन कार्याला वाहून घेतलेल्या अनेक संस्था असून त्याच्या नियतकलिकांतून अद्य यावत् अनेक ताम्रपट्ट शिलाशासनें प्रसिद्ध झालीं आहेत, आणि त्यावर विद्वान् संशोधकांचे

विवेचनात्मक लेखहि प्रसिद्ध झाले आहेत. अशा प्रकारचे लेख पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळ, भांडारकर प्राच्य विद्यासंशोधन मंदिर, धुळें येथील राजवाडे संशोधन मंडळ, मुंबई प्रिन्स ऑफ् वेल्स म्युझियम्, बडोदें पदार्थसंग्रहालय, ग्वालेर-इंदूर म्हैशूर-कलकत्ता-लाहोर पदार्थसंग्रहालय इत्यादि संस्थांमध्यें हे प्रत्यक्ष दृग्गोचर होत आहेत. असल्या शासनपत्रांत भूमिदानाचें माहात्म्य—भावीसत्ताधीशांनीं तें अखंड चालवावें म्हणून त्यांना प्रार्थना—तसें अखंड चालविणाराला लागणारें आणि त्याचा अपहार किंवा उच्छेद करणाराला लागणारें पाप इत्यादि गोष्टी विस्तरशः किंवा संक्षेपतः वर्णन केलेल्या असतात. त्या वर्णनांत.

दत्वा भूमिं भाविनः पार्थिवेन्द्रान्
भूयो भूयो याचते रामचन्द्रः ॥
सामान्योऽयं धर्मसेतुर्नराणां
काले काले पालनीयो भवद्भिः ॥

हा श्लोक प्रायः आढळतो. या श्लोकांतील भावी पार्थिवेन्द्रांची प्रार्थना करणारा हा रामचन्द्र कोण याचा शोध करतां तो स्कंदपुराणांतील ब्रह्मखंडाचे उत्तरार्धात धर्मारण्य-माहात्म्य आलें आहे, त्यांत ३४ व्या अध्यायांतील ४० वा श्लोक असल्याचें आढळून आलें. आणि भावी पार्थिवेंद्रांना प्रार्थना करणारा हा राजा दुसरा कोणी नसून प्रत्यक्ष प्रभु श्रीरामचंद्रच हें कळून आलें.

महर्षि वाल्मीकींनीं शतकोटि रामायण रचिलें अशी प्रसिद्धि

आहे. आणि प्रचलित रामायण हें २४००० चतुर्विंशति सहस्र श्लोकांत संक्षेपतः आणिलें आहे. गायत्रीमंत्राचे द्रष्टे भगवान् विश्वामित्र ऋषि बुधकौशिक या नांवानें श्री रामरक्षा स्तोत्राचे लेखक असल्याचे त्याच स्तोत्रांतील

आदिष्टवान् यथा स्वप्ने रामरक्षामिमां हरः ॥
तथा लिखितवान् प्रातः प्रबुद्धो बुधकौशिकः ॥

या श्लोकात वर्णिलें आहे. या स्तोत्राचे प्रारंभीं च

चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम् ॥

असें सांगितलें आहे.

श्रीभगवद्भक्त नामदेवांनीं शतकोटि अभंग रचिल्याची आख्यायिका प्रसिद्ध आहे. ह्यांत अत्युक्तिहि असूं शकेल. तथापि त्यांना दीर्घायुष्य लाभलें होतें. आणि महाराष्ट्रप्रमाणें पंचानु ( पंजाब ) देशांतहि पुष्कळ वर्षें भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि उपदेश करण्यांत घालविलीं. त्यांचा संप्रदाय आजहि त्या देशांत मोठ्या प्रमाणांत विद्यमान आहे. त्यांचीं मंदिरेंहि आहेत. त्याचे ६० अभंग शीखांच्या माननीय ग्रंथसाहेब या धार्मिक ग्रंथांत समाविष्ट झालेले आहेत.

विदर्भ देशांतील विद्वान् अंध शूद्रसाधु श्रीगुलाबराय महाराज हे ज्ञानेश्वरीच्या एकेका अभंगावर शतावधि ओव्या हां हां म्हणतां करीत. पूर्वाध्ययन न करतांसुद्धां वाटेल त्या विषयावर अधिकारयुक्त भाषण करीत. त्या त्या विषयांतील निष्णात विद्वान्हि तें ऐकून आश्चर्यचकित निरुत्तर होत.

कै० पुण्यश्लोक लोकमान्य टिळकादिकांचे प्रसिद्ध अप्रसिद्ध असे अनेक विस्तृत ग्रंथ झालेले आहेत.

श्रीमहाभारताच्या शांतिपर्वांतील ( कुंभघोण प्रत ) राजधर्मपर्वाचे ५८ वे अध्यायांत " लोभ मोहादिकांनीं वेद आणि तत्प्रोक्त धर्म नष्ट झाला असतां लोकांत अस्वास्थ्य उत्पन्न झालें असतां त्रस्त झालेले देव लोकपितामह ब्रह्मदेवाला शरण गेले आणि आपल्या आगमनाचें कारण त्याला निवेदन केलें. तें श्रवण करून

ततोऽध्यायसहस्राणां शतं चक्रे स्वबुद्धिजम् ॥
यत्र धर्मस्तथैवार्थः कामश्चैवानुवर्णितः ॥ २९ ॥
त्रिवर्ग इति विख्यातो गण एष स्वयंभुवा ॥
चतुर्थो मोक्ष इत्येव पृथगर्थः पृथग्गुणः ॥ ३० ॥

याप्रमाणें ( १००००० एक लक्ष) अध्यायांचा हा दण्डनीति ग्रंथ भगवान् ब्रह्मदेवानें रचिला. पुढील ५० श्लोकांत त्यांतील विषयांची सूची दिली आहे. नंतर ब्रह्मदेवाच्या ललाटापासून उत्पन्न झालेल्या विशालाक्ष शंकरानें त्या ग्रंथाचा स्वीकार केला. कालानुरूप आयुष्यांचा उत्तरोत्तर ऱ्हास होत असलेला पाहून भगवान् विशालाक्ष शंकरानें ( १०००० ) दशसहस्र अध्यायांत त्याचा संक्षेप करून तो इंद्राला दिला. इंद्रानें त्याचा संक्षेप करून ( ५००० ) पंच सहस्र अध्याय केले. इंद्रापासून तो बृहस्पतीला मिळाला. बृहस्पतीनें (३०००) तीन सहस्र अध्यायांत त्याचा संक्षेप करून शुक्राला तो ग्रंथ दिला. शुक्रानें त्याचा (१०००) एक सहस्र अध्यायांत संक्षेप

केला. या ग्रंथांना क्रमशः प्राजापत्य ( पैतामह )—वैशालाक्ष—बाहुदन्तक—बार्हस्पत्य—काव्य दण्डनीति अशा संज्ञा आहेत. अशा रीतीनें

एवं लोकानुरोधेन शास्त्रमेतन्महर्षिभिः ॥
संक्षिप्तमायुर्विज्ञाय लोकानां न्हासि पांडव ॥ १४ ॥

नंतर देवांच्या प्रार्थनेवरून भगवान् विष्णूनीं हें शास्त्र विरजा नांवाच्या आपल्या मानस पुत्राला दिलें. पुढें विरजापासून त्याचा पुत्र कीर्तिमान्—त्यापासून त्याचा पुत्र कर्दम—त्यापासून तत्पुत्र अनंग—त्यापासून तत्पुत्र अतिबल—त्या पासून तत्पुत्र वेन याला हें शास्त्र प्राप्त झालें. परंतु तो अधर्मानें वागूं लागतांच महर्षींनीं त्याचा वध करून त्याचे उजव्या मांडीपासून मंत्रपूत कुशानीं मंथन करून पृथु राजा निर्माण केला आणि त्याला हें शास्त्र समर्पण केलें. या वैन्य पृथूचें वर्णन अथर्ववेदाच्या अष्टम कांडाच्या पंचम अनुवाकांतील विराट् वर्णनाच्या चतुर्थ पर्यायांत आलें आहे.

सोदक्रामत्सा मनुष्या३ नागच्छत्तां मनुष्या३ उपाह्वयन्तेरावत्येहीति ॥ ( ९ )
तस्या मनुर्वैवस्वतो वत्स आसीत्पृथिवी पात्रम् ॥ ( १० )
तां पृथी वैन्योऽधोक्तां कृषिं च सस्यं चाधोक् ॥ ( ११ )
ते कृषिं च सस्यं च मनुष्या३ उप जीवन्ति कृष्टराधिरुपजीवनी यो भवति य एवं वेद ॥ ( १२ )

येथें पृथु शब्दाचे स्थानीं पृथी शब्द आला आहे.

एकाद्या महान्यायमंदिरांतील प्रचंड ग्रंथसंग्रहाकडे पहा

म्हणजे एक लक्ष अध्यायात्मक दण्डनीति ग्रंथाविषयीं आशंका घेण्याचें कारण नाहीं. श्रीरामचंद्रप्रभूचें महर्षि वाल्मीकिप्रणीत चरित शतकोटिप्रविस्तर असल्याविषयींहिं शंका घेण्याचें मुळींच कारण नाहीं. श्री एकनाथमहाराजांनींहि आपल्या भावार्थरामायणांत ५० पन्नास रामायणांचा प्रायः परामर्श घेतलेला आहे. अस्तु. इतकें विवेचन करण्याचा हेतु इतकाच कीं प्रचलित वाल्मीकि रामायणांत वर्णन न केलेलें श्रीरामचरित अन्यत्रहि आहे. आणि श्रीमहाभारत आणि प्रायः सर्व पुराणांत श्रीरामकथा आलेली आहे. अशा अनेक ग्रंथांत आलेल्या प्रसिद्ध अप्रसिद्ध सर्व श्रीरामकथा श्रीवाल्मीकि-रामायणाच्या शतकोटिप्रविस्तरांत आलेल्या असण्याचा संभव आहे. [ ऋग्वेदसंहितेची विद्यमान प्रत शौनकाच्या वेळीं होती तीच होय. आणि त्याच वेळीं काष्यपदृष्ट ५००५०० ऋचांच्या १००० सूक्तांतील एक ऋचेचें "जातवेदसे—" हें एकच सूक्त विद्यमान असून ५००४९९ ऋचांची ९९९ सूक्तें शौनकाचे वेळीं लुप्त झालीं असल्याचें बृहद्देवतेंत आणि सर्वानुक्रमांत स्पष्ट लिहिलेलें आहे. ] सर्व पुराणांत संख्येनें ( ८१००० ) श्रेष्ठ असें जें स्कंदपुराण त्यांतील ब्रह्मखंडाचे उत्तरार्धांत धर्मारण्यमाहात्म्य आलें आहे. त्यांत

एवमुक्त्वा ततो रामः प्रहृष्टेनान्तरात्मना ॥
देवतामथ वापीश्च प्राकारांस्तु सुशोभनान् ॥ ४८ ॥
दुर्गोपकरणैर्युक्तान् प्रतोलीश्च सुविस्तृताः ॥
निर्ममे चैव कुण्डानि सरांसि सरसीस्तथा ॥ ४९ ॥

धर्मवापीश्च कूपांश्च तथाऽन्यान्देवनिर्मितान् ॥
एतत्सर्वं च विस्तार्य धर्मारण्ये मनोरमे ॥ ५० ॥
ददौ त्रैविद्यमुख्येभ्यः श्रद्धया परया युतः ॥
ताम्रपट्टस्थितं राजशासनं लोपयेत्तु यः ॥ ५१ ॥
पूर्वजास्तस्य नरके पतंत्यग्रे न संततिः ॥
वायुपुत्रं समाहूय ततो रामोऽब्रवीद्वचः ॥ ५२ ॥
वायुपुत्र महावीर तव पूजा भविष्यति ॥
अस्य क्षेत्रस्य रक्षार्थे त्वमत्र स्थितिमाचर ॥ ५३ ॥
आञ्जनेयस्तु तद्वाक्यं प्रणम्य शिरसा दधौ ॥
जीर्णोद्धारं तदा कृत्वा कृतकृत्यो बभूव ह ॥ ५४ ॥
श्रीमातरं तदाभ्यर्च्य प्रसन्नेनान्तरात्मना ॥
श्रीमातरं नमस्कृत्य तीर्थान्यन्यानि राघवः ॥ ५५ ॥
तेऽपि देवाः स्वकं स्थानं ययुर्ब्रह्मपुरोगमाः ॥
दत्त्वाऽऽशिषं तु रामाय वाञ्छितं ते भविष्यति ॥ ५६ ॥
रम्यं कृतं त्वया राम विप्राणां स्थापनादिकम् ॥
अस्माकमपि वात्सल्यं कृतं पुण्यवता त्वया ॥ ५७ ॥
इति स्तुवन्तस्ते विप्राः स्वानि स्थानानि भेजिरे ॥

॥ इति श्रीस्कान्दे महापुराण एकाशीतिसाहस्रयां संहितायां तृतीये ब्राह्मखण्डे पूर्वार्धे धर्मारण्यमाहात्म्ये श्रीरामचंद्रस्य पुरप्रत्यागमनवर्णनं नाम त्रयस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३३ ॥

व्यास उवाच ।

एवं रामेण धर्मज्ञ जीर्णोद्धारः पुरा कृतः ॥

द्विजानां च हितार्थाय श्रीमातुर्वचनेन च ॥ १ ॥

युधिष्ठिर उवाच ।

कीदृशं शासनं ब्रह्मन् रामेण लिखितं पुरा ॥
कथयस्व प्रसादेन त्रेतायां सत्यमंदिरे ॥ २ ॥

व्यास उवाच ।

धर्मारण्ये वरे दिव्ये बहुलार्के स्वधिष्ठिते ॥
शून्यस्वामिनि विप्रेन्द्र स्थिते नारायणे प्रभौ ॥ ३ ॥
रक्षणाधिपतौ देवे सर्वज्ञे गुणनायके ॥
भवसागरमग्नानां तारिणी यत्र योगिनी ॥ ३ ॥
शासनं तत्र रामस्य राघवस्य च नामतः ॥
शृणु ताम्राश्रयं पत्रं लिखितं धर्मशास्त्रतः ॥ ४ ॥
महाश्चर्यकरं तत्र ह्यनेकयुगसंस्थितम् ॥
सर्वोधातुः क्षयं याति सुवर्णं क्षयमेतिच ॥ ५ ॥
प्रत्यक्षं दृश्यते पुत्र द्विजशासनमक्षयम् ॥
अविनाशो हि ताम्रस्य कारणं तत्र विद्यते ॥ ६ ॥
वेदोक्तं सकलं यस्माद्विष्णुरेव हि कथ्यते ॥
पुराणेषु च वेदेषु धर्मशास्त्रेषु भारत ॥ ८ ॥
सर्वत्र गीयते विष्णुर्नानाभावसमाश्रयः ॥
नानादेशेषु धर्मेषु नानाधर्मनिषेविभिः ॥ ९ ॥
नानाभेदैस्तु सर्वत्र विष्णुरेवेति चिन्त्यते ॥
अवतीर्णः स वै साक्षात् पुराणपुरुषोत्तमः ॥ १० ॥
देववैरिविनाशाय धर्मसंरक्षणाय च ॥
तेनेदं शासनं दत्तमविनाशात्मकं सुत ॥ ११ ॥

यस्य प्रसादाद् दृषतस्तारिता जलमध्यत: ॥
वानरैर्वेष्टिता लंका हेतया राक्षसा हताः ॥ १२ ॥
मुनिपुत्रं मृतं रामो यमलोकादुपानयन् ॥
दुंदुभिर्निहतो येन कबंधोऽभिहतस्तथा ॥ १३ ॥
निहता ताडका चैव सप्तताला विभेदिताः ॥
खरश्च दूषणश्चैव त्रिशिराश्च महासुरः ॥ १४ ॥
चतुर्दश सहस्राणि जवेन निहता रणे ॥
तेनेदं शासनं दत्तमक्षयं न कथं भवेत् ॥ १५ ॥
स्ववंशवर्णनं तत्र लिखित्वा स्वयमेव तु ॥
देशकालादिकं सर्वं लिलेख विधिपूर्वकम् ॥ १६ ॥
स्वमुद्राचिह्नितं तत्र त्रैविद्येभ्यस्तदा ददौ ॥
चतुश्चत्वारिंश वर्षो रामो दशरथात्मजः ॥ १७ ॥
तस्मिन् काले महाश्चर्यं संदत्तं किल भारत ॥
तत्र स्वर्णोपमं चापि रौप्योपममथापि च ॥ १८ ॥
उवाह सलिलं तीर्थे देवर्षिपितृतृप्तिदम् ॥
स्ववंशनायकस्याग्रे सूर्येण कृतमेव तत् ॥ १९ ॥
तद् दृष्ट्वा महदाश्चर्यं रामो विष्णुं प्रपूज्य च ॥
रामलेखविचित्रैस्तु लिखितं धर्मशासनम् ॥ २० ॥
यद् दृष्ट्वाऽथ द्विजाः सर्वे संसारभयबंधनम् ॥
कुर्वते नैव यस्माच्च तस्मान्निखिलरक्षकम् ॥ २१ ॥
ये पापिष्ठा दुराचारा मित्रद्रोहरताश्च ये ॥
तेषां प्रबोधनार्थाय प्रसिद्धिमकरोत्पुरा ॥ २२ ॥
रामलेखविचित्रैस्तु लिखिते ताम्रपट्टके ॥
वाक्यानीमानि श्रूयन्ते शासने किल नारद ॥ २३ ॥

आस्फोटयन्ति पितरः कथयन्ति पितामहाः ॥
भूमिदोऽस्मत्कुले जातोऽस्मान् संतारयिष्यति ॥२४॥
बहुभिर्बहुधा भुक्ता राजभिः पृथिवी त्वियम् ॥
यस्य यस्य यदा भूमिस्तस्य तस्य तदा फलम् ॥२५॥
षष्टिर्वर्षसहस्राणि स्वर्गे वसति भूमिदः ॥
आच्छेत्ता चानुमन्ता च तान्येव नरके बसेत् ॥२६॥
संदंशैस्तुद्यमानस्तु मुद्गरैर्विनिहत्य च ॥
पाशैःसुबध्यमानस्तु रोरवीति महास्वनम् ॥ २७ ॥
ताड्यमानः शिरे दंडैः समालिंग्य विभावसुम् ॥
क्षुरिकया छिद्यमानो रोरवीति महास्वनम् ॥ २८ ॥
यमदूतैर्महाघोरै ब्रह्मवृत्तिविलोपकाः ॥
एवं विधैर्महादुष्टैः पीड्यन्ते ते महागणैः ॥ २९ ॥
ततास्तिर्यक्त्वमाप्नोति योनिं वा राक्षसीं शुनीम् ॥
व्यालीं शृगालीं पैशाचीं महाभूतभयंकरीम् ॥ ३० ॥
भूमेरंगुलहर्ता हि स कथं पापमाचरेत् ॥
भूमेरंगुलदाता च स कथं पुण्यमाचरेत् ॥ ३१ ॥
अश्वमेधसहस्राणां राजसूयशतस्य च ॥
कन्याशतप्रदानस्य फलं प्राप्नोति भूमिदः ॥ ३२ ॥
आयुर्यशः सुखं प्रज्ञां धर्मो धान्यं धनं जयः ॥
संतानं वर्धते नित्यं भूमिदः सुखमश्नुते ॥ ३३ ॥
भूमेरंगुलमेकं तु ये हरंति खला नराः ॥
वंध्याटवीष्वतोयासु शुष्ककोटरवासिनः ॥ ३४ ॥
कृष्णसर्पाः प्रजायन्ते दत्तदायापहारकाः ॥
तडागानां सहस्रेण अश्वमेधसहस्रेण वा ॥ ३५ ॥

गवां कोटिप्रदानेन भूमिहर्ता विशुध्यति ॥
यानीह दत्तानि पुनर्धनानि
दानानि धर्मार्थयशस्कराणि ॥
औदार्यतो विप्रनिवेदितानि
को नाम साधुः पुनराददीत ॥
चलदलदललीलाचञ्चले जीवलोके
तृणलवलघुसारे सर्वसंसारसौख्ये ॥
अपहरति दुराशः शासनं ब्राह्मणानाम्
नरकगहनवर्तावर्तपातोत्सुको यः ॥ ३७ ॥
ये पास्यन्ति महीभुजः क्षितिमिमां
यास्यन्ति भुक्त्वाऽखिलाम् ।
नो याता न तु याति यास्यति न वा
केनाऽपि सार्धं धरा ॥
यत् किञ्चिद्भुवि तद् विनाशि सकलं
कीर्तिः परं स्थायिनी ॥
त्वेवं वै वसुधाऽपि यैरुपकृता
लोप्या न सत्कीर्तयः ॥ ३८ ॥
एकैव भगिनी लोके सर्वेषामेवं भूभुजाम् ॥
न भोज्या न करग्राह्या विप्रदत्तो वसुंधरा ॥ ३९ ॥
दत्त्वा भूमिं भाविनः पार्थिवेन्द्रान्
भूयो भूयो याचते रामचन्द्रः ॥
सामान्योऽयं धर्मसेतुर्नराणाम्
स्वे स्वे काले पालनीयो भवद्भिः ॥ ४० ॥

अस्मिन् वंशे क्षितौ कोऽपि राजा यदि भविष्यति ॥
तस्याऽहं करलग्नोऽस्मि मद्दत्तं यदि पाल्यते ॥ ४१ ॥
लिखित्वा शासनं रामश्चतुर्वेद्यद्विजोत्तमान् ॥
संपूज्य प्रददौ धीमान् वसिष्ठस्य च संनिधौ ॥ ४२ ॥
ते वाडवाऽगृहीत्वा तं पत्रं रामाज्ञया शुभम् ॥
ताम्रं हैमाक्षरयुतं धर्म्यं धर्मविभूषणम् ॥ ४३ ॥
पूजार्थे भक्तिकामार्थास्तद्रक्षणमकुर्वत ॥
चन्दनेन च दिव्येन पुष्पेण च सुगन्धिना ॥ ४४ ॥
तथा सुवर्णपुष्पेण रौप्यपुष्पेण वा पुनः ॥
अहन्यहनि पूजां ते कुर्वते वाडवाः शुभम् ॥ ४५ ॥
तदग्रे दीपकं चैव घृतेन विमलेन हि ॥
सप्तवर्तियुतं राजन्नर्घ्यं प्रकुर्वते द्विजाः ॥ ४६ ॥
नैवेद्यं कुर्वते नित्यं भक्तिपूर्वं द्विजोत्तमाः ॥
राम रामेति रामेति मंत्रमप्युच्चरंति हि ॥ ४७ ॥
अशने शयने पाने गमने चोपवेशने ॥
सुखे वाऽप्यथ वा दुःखे राममंत्र समुच्चरेत् ॥ ४८ ॥
न तस्य दुःखदौर्भाग्यं नाधिव्याधिभयं भवेत् ॥
आयुः श्रियं बलं तस्य वर्धयन्ति दिने दिने ॥ ४९ ॥
रामेति नाम्ना मुच्येत पापाद्वै दारुणादपि ॥
नरकं नहि गच्छेत गतिं प्राप्नोति शाश्वतीम् ॥ ५० ॥

व्यास उवाच ।

इति कृत्वा ततो रामः कृतकृत्यममन्यत ॥
प्रदक्षिणीकृत्य तदा प्रणम्यच दिनान् बहून् ॥ ५१ ॥

दत्त्वा दानं भूरितरं गजाश्वमहिषीरथम् ॥
ततः सर्वान्तिबांस्ताँश्च वाक्यमेतदुवाच ह ॥ ५२ ॥
अत्रैव स्थीयतां सर्वैर्यावच्चन्द्रदिवाकरौ ॥
यावन्मेरुर्महीपृष्ठे सागराः सप्त एव च ॥ ५३ ॥
तावदत्रैव स्थातव्यं भवद्भिर्हि न संशयः ॥
यदा हि शासनं विप्रा न मन्यन्ते नृपा भुवि ॥ ५४ ॥
अथवा वणिजः शूरा मदमायाविमोहिताः ॥
मदाज्ञां न प्रकुर्वन्ति मन्यन्ते वा न ते जनाः ॥ ५५ ॥
तदा वै वायुपुत्रस्य स्मरणं क्रियतां द्विजाः ॥
स्मृतमात्रो हनूमान् वै समागत्य करिष्यति ॥ ५६ ॥
सहसा भस्मतान् सत्यं वचनान्मे न संशयः ॥
य इदं शासनं रम्यं पालयिष्यति भूपतिः ॥ ५७ ॥
वायुपुत्रः सदा तस्य सौख्यमृद्धिं प्रदास्यति ॥
ददाति पुत्रान् पौत्रांश्च साध्वीं पत्नीं यशोमयम् ॥५८॥
इत्येवं कथयित्वा च हनूमंतं प्रबोध्य च ॥
निवर्तितो रामदेवः ससैन्यः सपरिच्छदः ॥ ५९ ॥
वादित्राणां स्वनैर्विष्वक् सूच्यमानशुभागमः ॥
श्वेतातपत्रयुक्तोऽसौ चामरैर्वीजितो नरैः ॥ ६० ॥
इति श्रीस्कान्दे महापुराणे एकाशीतिसाहस्र्यां संहितायां तृतीये ब्राह्मखंडे पूर्वार्धे धर्मारण्यमाहात्म्ये ब्रह्मनारद संवादे श्रीरामेण ब्राह्मणेभ्यः शासनपट्टप्रदान वर्णनं नाम चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३४ ॥
या स्कंदपुराणांतील अवतरणांवरून उपलब्ध ताम्रपट्टांत

बाहुल्यानें येणाऱ्या सामान्योऽयं भूयो भूयो याचते रामचंद्रः" या श्लोकांतील रामचंद्र कोण हें स्पष्ट होत आहे. प्रभु रामचंद्राच्या उपर्युक्त अनुशासनांत आलेले बरेच श्लोकहि अनेक ताम्रपट्टांत आढळतात. पण या श्लोकांचा एकत्र संग्रह पाहावयाचा तर आपणाला श्रीबृहस्पतिस्मृति अवलोकन केली पाहिजे. आनंदाश्रम पुणें या संस्थेचे ग्रंथावलींत सप्तविंशति स्मृतिसमुच्चय प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील बृहस्पतिस्मृतींत ८० श्लोक आणि पाठांतराचे ८ असे ८८ श्लोक आले आहेत. ही स्मृति इन्द्रबृहस्पतिसंवाद रूप आहे. इन्द्रानें प्रश्न केल्यावरून बृहस्पतीनें त्याचें उत्तर दिलें आहे. यांतील आवश्यक अवतरण येथें देतों.

इष्ट्वा क्रतुशतं राजा समाप्तवरदक्षिणम् ॥
भगवन्तं गुरुश्रेष्ठं पर्यपृच्छद् बृहस्पतिम् ॥१॥
भगवन् केन दानेन सर्वतः सुखमेधते ॥
यदक्षयमहार्यं च तन्मे ब्रूहि महातप ॥२॥
एवमिन्द्रेण पृष्टोऽसौ देवदेवपुरोहितः ॥
वाचस्पतिर्महाप्राज्ञो बृहस्पतिरुवाच हि ॥३॥
सुवर्णदानं गोदानं भूमिदानं च वासव ॥
एतत्प्रयच्छमानस्तु सर्वपापैः प्रमुच्यते ॥४॥
[ अग्नेरपत्यं प्रथमं सुवर्णं भूर्वैष्णवी सूर्यसुताश्च गावः ॥
लोकास्त्रयस्तेन भवन्ति दत्ता यः कांचनं गां च महीं च दद्यात् ]
[ सर्वेषामेव दानानामेकजन्मानुगं फलम् ॥
हाटकक्षितिगौरीणां सप्तजन्मानुगं फलम् ॥ ]

सुवर्णं रजतं वस्त्रं मणिरत्नं च वासव ॥
सर्वमेव भवेद्दत्तं वसुधां यः प्रयच्छति ॥५॥
फालकृष्टां महीं दत्त्वा सबीजां सस्यशालिनीम् ॥
यावत्सूर्यकृता लोकास्तावत् स्वर्गे महीयते ॥६॥
यत् किंचित्कुरुते पापं पुरुषोवृत्तिकर्शितः ॥
अपि गोचर्ममात्रेण भूमिदानेन शुध्यति ॥७॥
दशहस्तेन दंडेन त्रिंशद्दंडो निवर्तनम् ॥
दशतान्येव विस्तारो गोचर्मैतन्महाफलम् ॥८॥
सवृषं गोसहस्रं तु यत्र तिष्ठत्यतंद्रिवम् ॥
बालवत्साप्रसूतानां तद्गोचर्म इति स्मृतम् ॥९॥
विप्राय दद्याच्च गुणान्विताय तपोऽभियुक्ताय जितेन्द्रियाय ॥
यावन्मही तिष्ठति सागरान्ता तावत्फलं तस्य भवेदनन्तम् ॥१०॥
यथा बीजानि रोहन्ति प्रकीर्णानि महीतले ॥
एवं कामाः प्ररोहन्ति भूमिदानसमर्जिताः ॥२१॥
यथाऽप्सु पतितः शक्र तैलबिन्दुः प्रसर्पति ॥
एवं भूमि (मेः) कृतं दानं सस्ये सस्ये प्ररोहति ॥२२॥
अन्नदः सुखितो नित्यं वस्त्रदश्चैव रूपवान् ॥
स नरः सर्वदो भूप यो ददाति वसुंधराम् ॥२३॥
[ इक्षुभिः संततां भूमिं व्रीहिभिर्यवशाद्वलैः ॥
यो ददाति सहस्राक्ष न स प्रच्यवते दिवः ॥ ]
यथा गौर्भरते वत्सं क्षीरमुत्सृज्य क्षीरिणी ॥
एवं दत्ता सहस्राक्ष भूमिर्भरति भूमिदम् ॥१४॥
शंखं भद्रासनं छत्रं चरस्थावरवारणाः ॥
भूमिदानस्य पुण्येन फलं स्वर्गः पुरन्दर ॥१५॥

आदित्यो वरुणो वह्निर्ब्रह्मा सोमो हुताशनः ॥
शूलपाणिश्च भगवानभिनन्दन्ति भूमिदम् ॥१६॥
[ सौवर्णा यत्र प्रासादाः सोत्स्काराश्च कामदाः ॥
गन्धर्वाप्सरसो यत्र तत्र तिष्ठति भूमिदः ॥ ]
आस्फोटयन्ति पितरः प्रहर्षंति पितामहाः ॥
भूमिदाता कुले जातः स नस्त्राता भविष्यति ॥१७॥
त्रीण्याहुरतिदानानि गावः पृथ्वी सरस्वती ॥
तारयन्तीह दातारं जपवापनदोहनैः ॥१८॥
पृथोर्यदो दिलीपस्य नृपस्य नहुषस्य च ॥
सगरस्य दिलीपस्य ययातेर्नहुषस्य च ॥
अन्येषां च नरेंद्राणां पुनरन्या भविष्यति ॥२५॥
बहुभिर्वसुधा दत्ता राजभिः सगरादिभिः ॥
यस्य यस्य यदा भूमिस्तस्य तस्य तदा फलम् ॥२६॥
स्वदत्तां परदत्तां वा यो हरेत वसुंधराम् ॥
स्वविष्ठायां कृमिर्भूत्वा पितृभिः सह पच्यते ॥२४॥
आच्छेत्ता चानुमंता च तमेक नरकं व्रजेत् ॥
भूमिदो भूमिहर्ता च नापरं पुण्यपापयोः ॥२९॥
ऊर्ध्वाऽधो वाऽवतिष्ठेत यावदाभूतसंप्लवम् ॥
अग्नेरपत्यं प्रथमं सुवर्णं
भूर्वैष्णवी सूर्यसुताश्च गावः ॥
लोकास्त्रयस्तेन भवन्ति दत्ता
यः काञ्चनं गां च महीं च दद्यात् ॥३०॥
षडशीतिसहस्राणां योजनानां वसुंधरा ॥
स्वतां दत्ता तु सर्वत्र सर्वकामप्रदायिनी ॥३१॥

भूमिं यः प्रतिगृह्णाति भूमिं यश्च प्रयच्छति ॥
उभौ तौ पुण्यकर्माणौ नियतं स्वर्गगामिनौ (गौ) ॥३२॥
सर्वेषामेव दानानामेकजन्मानुगं फलम् ॥
हाटकक्षितिगौरीणां सप्तजन्मानुगं फलम् ॥३३॥
अन्यायेन हृताभूमिर्यैर्नरैरपहारिता ॥
हरतो हारयत्यस्तु हन्युस्ते सप्तमं कुलम् ॥३५॥
हरते हारयेद्यस्तु मन्दबुद्धिस्तमोऽन्वितः ॥
स बद्धो वारुणैः पाशैस्तिर्यग्योनिषु जायते ॥३६॥
असुभिः पतितैस्तेषां दानानामवकीर्तनम्
ब्राह्मणस्य हृतेक्षेत्रे हन्ति त्रिपुरुषं कुलम् ॥३७॥
वापी कूपसहस्रेण अश्वमेधशतेन च ॥
गवां कोटिप्रदानेन भूमिहर्ता न शुध्यति ॥३८॥
गामेकां स्वर्णमेकं वा भूमेरप्यर्धमंगुलम् ॥
हरन्नरकमायाति यावदाभूतसंप्लवम् ॥३९॥
हुतं दत्तं तपोऽधीतं यत् किञ्चिद्धर्मसंचितम्
अर्धाङ्गुलस्य सीमाया हरणेन विनश्यति ॥४०॥
हन्ति जातानजातांश्च हिरण्यार्थेऽनृतं वदन् ॥
सर्वं भूम्यनृते हन्ति मा स्म भूम्यनृतं वदीः ॥४४॥
ब्रह्मस्वे मा रतिं कुर्यात्प्राणैः कण्ठगतैरपि ॥
अनौषधमभैषज्यं विषमेतद्धलाहलम् ॥४५॥
श्रोत्रियाय कुलीनाय दरिद्राय च वासव ॥
संतुष्टाय विनीताय सर्वभूतहिताय च ॥५६॥
वेदाभ्यासतपोज्ञानमिन्द्रियाणां च संयमः ॥
ईदृशाय सुरश्रेष्ठ यद्दत्तं हि तदक्षयम् ॥५७॥

आमपात्रे यथा न्यस्तं क्षीरं दधि घृतं मधु ॥
विनश्येत्पात्रदौर्बल्यात्तच्च पात्रं विनश्यति ॥५८॥
एवं गां च हिरण्यं च वस्त्रमन्नं महीं तिलान्
अविद्वान् प्रतिगृह्णाति भस्मीभवति काष्ठवत् ॥५९॥

या बृहस्पति स्मृतींतील अवतरणांवरून श्रीस्कान्दपुराण-संहितेंतील धर्मारण्य महात्म्यांतील श्रीरामचंद्रकृत शासनपट्ट-प्रदानाध्यायांत बरेच श्लोक घेतलेले आहेत असें स्पष्ट दिसतें. प्रस्तुत उपलब्ध ताम्रपटांमध्यें हेच श्लोक न्यून अधिक प्रमाणांत घेतले आहेत.

बृहस्पति स्मृतींतील ३० वा श्लोक “ अग्नेरपत्यं प्रथमं सुवर्णं ” हा आहे. या स्मृतीचें मूल अवलोकन करण्याकरितां श्रीमदथर्ववेदांतील एकोनविंश कांडातील तृतीय अनुवाकाच्या ‘ हिरण्यधारण ’ नामक षड्विंश सूक्ताचा आश्रय केला पाहिजे. तें असें—

अग्नेः प्रजातं परियद्धिरण्यममृतं दधे अधि मर्त्येषु ॥
स एनद्वेद स इदेनमर्हति जरामृत्युर्भवति यो बिभर्ति ॥१॥
यद्धिरण्यं सूर्येण सुवर्णं प्रजावन्तो मनवः पूर्व ईषिरे ॥
तत्त्वा चंद्रं वर्चसा सं सृजत्यायुष्मान् भवति यो बिभर्ति ॥२॥
आयुषे त्वा वर्चसे त्वौजसे च बलाय च ॥
यथा हिरण्यतेजसा विभासासि जनाँ अनु ॥३॥
यद्वेद राजा वरुणो वेद देवो बृहस्पतिः ॥
इन्द्रो यद् वृत्रहा वेद तन्न आयुष्यंऽ भुवत्तत्ते वर्चस्वंऽ भुवत् ॥ ४ ॥

ऋग्वेदाच्या परिशिष्टांत-खिलसूक्तें आहेत. त्यांतील सप्तमाध्यायाचे १६ वर्गानंतर = दशम मंडळाचे १२९ सूक्तानंतर ११ ऋचांचे सूक्तांत प्रायः अथर्वोक्त सूक्त अधिक विस्तरानें आलें आहे.

राजसूययज्ञांत पांडवांनीं संपादन केलेली अगणित संपत्ति पाहून दुर्योधन विषण्ण अंतःकरणानें हस्तिनापुरास परत येऊन शकुनिमामाला म्हणतो—भारतचंपूचतुर्थस्तबक

"अग्नेरपत्यमिति हेम यदाहुरेतन्
मिथ्या न मातुल विरोधिमुखेऽनुभूतम् ॥
तत्स्मर्यमाणमखिलक्षितिपोपनीतं
नक्तं दिवं दहति चित्तमिदं यतो मे ॥१८॥

श्रीछित्तराजदेवशिलाहाराचे ९४८ संवतांत कार्तिकी पूर्णिमेला दिलेल्या ताम्रपटांत "अग्नेरपत्यं प्रथमं सुवर्णं— "हा श्लोक आहे. काव्यमाला प्रथम गुच्छ १८ वा लेख पहा. आतां ताम्रपटासंबंधीं श्रीयाज्ञवल्क्य काय म्हणतात तें पाहूं

आचाराध्याये—राजधर्माः ।
दत्त्वा भूमिं निबंधं वा कृत्वा लेख्यं तु कारयेत् ॥
आगामिभद्रनृपतिपरिज्ञानाय पार्थिवः ॥३१८॥
पटे वा ताम्रपटे वा स्वमुद्रोपरिचिन्हितम् ॥
अभिलेख्यात्मनो वंश्यानात्मानं च महीपतिः ॥३१९॥
प्रतिग्रहपरीमाणं दानच्छेदोपवर्णनम् ॥
स्वहस्तकालसंपन्नं शासनं कारयेच्छुभम् ॥३२०॥

यावरील शिलाहारवंशोद्भव श्रीमदपरार्कापराभिधान अपरादित्यटीकेंत बृहस्पतिस्मृतींतले म्हणून—

दत्त्वा भूम्यादिकं राजा ताम्रपट्टेऽथ वा पटे ॥
शासनं कारयेद्धर्म्यं स्थानवंशादिसंयुतम् ॥
अनाच्छेद्यमनाहार्यं सर्वभाव्यविवर्जितम् ॥
चन्द्रार्कसमकालीनं पुत्रपौत्रान्वयागतम् ॥
दातुः पालयितुः स्वर्गं हर्तुर्नरकमेव च ॥
षष्टिं वर्षसहस्राणि दानच्छेदफलं लिखेत् ॥
स्वमुद्रावर्षमासार्धदिनाध्यक्षाक्षरान्वितम् ॥
एवं कृतं राजकृतं शासनं समुदाहृतम् ॥

हे श्लोक दिले आहेत परंतु आनंदाश्रममुद्रितप्रतींत ते आढळत नाहीत.

शुक्रनीतीच्या द्वितीयाध्यायांत यासंबंधी लेखाचा हेतु, त्याचें महत्त्व इत्यादि सुंदर वर्णन आहे—

भ्रान्तिः पुरुषधर्मत्वाल्लेख्यं निर्णायकं परम् ॥
अलेख्यमाज्ञापयति ह्यलेख्यं यत्करोति यः ॥२८२॥
राजकृत्यमुभौ चोरौ तौ भृत्यनृपती सदा ॥
नृपसंचिन्हितं लेख्यं नृपस्तन्न नृपो नृपः ॥ २८३॥
समुद्रं लिखितं राज्ञो लेख्यं तच्चोत्तमोत्तमम् ॥
उत्तमं राजलिखितं मध्यं मन्त्र्यादिभिः कृतम् ॥२८४॥
कालेऽतीते विस्मृतिर्वा भ्रान्तिः संजायते नृणाम् ॥
अनुभूतस्य स्मृत्यर्थं लिखितं निर्मितं पुरा ॥२८८॥
यत्नाच्च ब्रह्मणा वाचां वर्णस्वरविचिन्हितम् ॥२८९॥
स्वहस्तकालसंपन्नं शासनं पत्रमेव तत् ॥
देशादिकं यस्य राज्ञा लिखितेन प्रयच्छति ॥२९४॥

सेवाशौर्यादिभिस्तुष्टः प्रसादलिखितं हि तत् ॥२९५॥
अनाच्छेद्यमनाहार्यं दानलेख्यं तदुच्यते ॥२९८॥

राजानें कोणाकडून तो लिहवावा, त्यांत काय विषय यावेत याविषयी अपरार्कानें व्यासवचनें उद्धृत केलीं आहेत तीं अशीं–

राजा तु स्वयमादिष्टः सन्धिविग्रहलेखकः ॥
ताम्रपट्टे पट्टे वाऽपि प्रलिखेद्राजशासनम् ॥
स्थानं वंशानुपूर्वीं च देशं ग्राममुपागतम् ॥
ब्राह्मणांस्तु तथैवान्यान्मान्यानधिकृतॉंल्लिखेत् ॥
कुटुम्बिनोऽथ कायस्थदूतवैद्यमहत्तरान् ॥
मेदचण्डालपर्यंतान् सर्वान् संबोधयन्निति ॥
मातापित्रोरात्मनस्तु पुण्यायामुकसूनवे ॥
दत्तं मयाऽमुकायाऽद्य दानं सब्रह्मचारिणे ॥
चन्द्रार्क
अनाच्छेद्य
दातुः पालयितुः
षष्टिं वर्षसहस्राणि
ज्ञातं मयेति लिखितं दानच्छेदफलं लिखेत् ॥
अब्दमासतदर्धाहं राजमुद्राङ्कितं तथा ॥
अनेन विधिना लेख्यं राजशासनकं भवेत् ॥

वर उद्धृत केलेल्या याज्ञवल्क्यश्लोकांवरील मिताक्षरा जिज्ञासूनीं मुळांतूनच पाहावी. विस्तरभिया येथें देत नाही. आम्हीं पाहिलेल्या ताम्रपट्टांत धुळें येथील भूतपूर्व प्रभात मासिकांतील शक ३४७ श्रावणी १५ चा कटच्छुरि येथील ताम्रपट्ट फार प्राचीन आहे.

ताम्रपट्टाची भाषा आणि लिपि प्राचुर्यानें संस्कृत आणि देवनागरी वा ब्राह्मी असते. क्वचित् तत्तद्देशीय असते.

ताम्रपट्टावरील लिखाण एका अंगावर किंवा पाठपोट दोनहि अंगांवर असतात. अनेक पत्रे असल्यास आद्यंत पत्रे आंतील अंगानें उत्कीर्ण केलेलें असतें. अनेक पत्रे एकत्र अडकविणेकरितां सर्व पत्र्यांस छिद्र पाडून त्यांत कडी घालून ती डाक बंद करून हनुमान् गरुत्मान् वराह इत्यादि मुद्रा केलेली असते. ताम्रपट्ट मसीनें लिहित नाहीं तर ते शस्त्रानें उत्कीर्ण केलेले असतात. अद्यापि राजापुर येथें श्रीयुत वेदमूर्ति महादेव विष्णुभट्ट दीक्षित गुर्जर यांचेकडे कोतापुर (कुंतापुर) येथील श्री भोजराज शिलाहारानें शके ११११ कार्तिक कृष्ण ३० सोमवार विरोधकृत् संवत्सरी (१११२ मार्ग कृष्ण ३० बुधवार ?) श्री गोविंदभट्ट पटवर्धन गुर्जर यांना दिलेल्या ताम्रपट्टाची तीन सुट्या ताम्रपत्रांवर लाक्षामसीनें लिहिलेली एक प्रतिमा आहे. बाजूचे पत्रे आंतील अंगानें आणि मध्यम उभयांगानें लिहिलेला असून कडीचें स्थान कोरें आहे. मूळ ताम्रपट्ट आतां उपलब्ध नाहींत. पुरातत्त्वभूषण कै. इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं तो प्रभात मासिकांत कोरदष्ट कागदी प्रतिकृतीवरून प्रसिद्ध केला सुस्थित अन्य प्रतिमाहि आतां उपलब्ध आहेत. चिपोळूण येथील आमचे सन्मित्र श्रीयुत विष्णु वासुदेव आठल्ये यांनीं आठल्ये घराण्याचे इतिहासाचे प्रथम खंडांत तो प्रसिद्ध केला आहे.

संगमेश्वरकर जोशी आणि गोळवळकर पाध्ये यांचे वादांत एका कृत्रिम ताम्रपटाचें सत्य स्वरूप श्री वेदशास्त्रसंपन्न न्यायमूर्ति रामशास्त्री प्रभुणे यांचे पुढें प्रकट झाल्याचें बहुश्रुत विद्वानांचे स्मरणांत असेलच. तसेंच शक १११३ कर्कसंक्रांतीला शिलाहार राजपुत्र यानें दिलेल्या ताम्रपट्टावर तिसऱ्या पत्र्याच्या कोऱ्या अंगावर शके १२०१ त कोणी धृष्टानें पुरवणी केली आणि ती इतरांचे दृष्टोत्पत्तीला आल्यावर ती बहुतेक झास-रून काढण्यांत आल्याची गोष्ट संशोधकांनां अज्ञात नाहीं.

ताम्रपटाची आवश्यकता प्रायः भूमिदानाकरितां आहे आणि या भूमिदानाचे उद्देश वर जे आले आहेत त्याहून भिन्न अशा कार्यामध्यें भूमिदान येतें. तें कार्य म्हणजे मृताचें और्ध्वदेहिक हें होय. मृताहापासून एकादश दिवशीं करावयाच्या और्ध्वदेहिकांत द्यावयाचीं दानें, महादानें विहित आहेत. त्यांत भूमिदान याची महादानांत गणना आहे. या निमित्तानें एका ऐतिहासिक दुर्दैवी घटनेचें स्मरण होत आहे. जिज्ञासूंकरितां तें वृत्त येथें देऊन हा बराच लांबलेला लेख पुरा करितों.

रघुनाथ कृष्ण पाटणकर
वे. द. र. [illegible]

मुद्रक : ज. ग. जोशी, मोटार प्रिंटिंग प्रेस,
३९४ सदाशिव, पुणें २.